केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) अचलपूर जि.अमरावती या ठिकाणी २०० खाटांचे नविन रूग्णालय बांधकामाकरीता जिल्हाधिकारी, अमरावती यांना केंद्र व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०२२ प्र.क्र.०७/का-७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२

तारीख: २४ /०२/२०२३

**संदर्भ :-**

१. संचालक आरोग्य सेवा संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र जा.क्र.संआसे/कक्ष-७अ/टे-८/अल्प- संख्याक विभाग/निधी/७९१/२०२० दिं.१७/०२/२०२०.

२. सह सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.३७/आ-३, दि.२४/०२/२०२०.

३. अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्या ३० व्या Empowered Committee च्या बैठकीचे इतिवृत्त दि.१२/०१/२०२१.

४. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १३/७/२०२०-MsDP-MOMA, दि.०१/०२/२०२१.

५. अल्पसंख्याक विकास विभाग शासन निर्णय क्र.अविवि-२०२१/प्र.क्र.१९/का-७,दि.२२/०३/२०२१.

६. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.प्रशामा-२०१९/ प्र.क्र.२१५ (भाग-१) / आरोग्य-३, दि.०८/०३/२०२२.

७. अल्पसंख्याक विकास विभाग शासन ज्ञापन क्र.अविवि-२०२२/प्र.क्र.०७/का-७, दि.२२/०४/२०२२.

८. संचालक आरोग्य सेवा संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र जा.क्र.संआसे/कक्ष-३/टे-६/अल्प-संख्याक विभाग / निधी /८६६८-६७२ / २२ दिं.१७/०६/२०२२.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि.२८/१२/२०२० रोजी झालेल्या ३० व्या बैठकीत अचलपूर, जि.**अमरावती** या ठिकाणी जिल्हा रूग्णालय बांधकामासाठी रू.६३१७.८९/- लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिल्याचे संदर्भ क्र.४ येथे नमुद दि.०१/०२/२०२१ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. सदर प्रस्तावास केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० असून यामध्ये केंद्र शासनाचा एकूण हिस्सा रु.३७९०.७३४/- लाख व राज्य शासनाचा एकूण हिस्सा रू.२५२७.१५६/- लाख असा इतका आहे.

२. केंद्र शासनाने संदर्भ क्र. (५) येथील आदेशाद्वारे PMJVK अंतर्गत अचलपूर, जि.**अमरावती येथे** २०० खाटांच्या जिल्हा रूग्णालय बांधकामाकरीता वितरित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रू.४७३.८३७/- लाख तसेच राज्य हिश्श्यातील रू.१२६.३६ /- लाख असा एकूण रू.६००.१९७ /- लाख ( केंद्र + राज्य ) इतका निधी प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन) यांना सुपूर्द करण्यात आला होता.

सहसंचालक आरोग्य सेवा, (रूग्णालये) यांनी आचलपूर जि.अमरावती येथील २०० खाटांच्या बांधकामास दि.३१/३/२०२२ पर्यंत प्रशासकीय मान्यता मिळाली नसल्याने सदर निधी आहरण व संवितरण अधिकारी यांचे खात्यात विनावापर जमा असल्याने सदरची रक्कम अद्यापही खर्च न झाल्याने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडून मार्च-२०२१ अखेरीस काढण्यात आलेल्या अखर्चित रक्कमा शासन खाती जमा करण्याबाबतची माहिती संचालनालय,लेखा व कोषागारे यांना तात्काळ सादर करण्याबाबतच्या सूचना देण्यात आलेल्या होत्या. त्यानुषंगाने रू.६००.५८०/- लाख इतका निधी चलनाव्दारे शासनखाती जमा केला आहे. सहसंचालक आरोग्य सेवा, (रूग्णालये) यांनी शासना खाती जमा करण्यात आलेला निधी सन २०२२-२३ च्या उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून SNA खात्यामध्ये घेण्यात आला आहे. SNA खात्यामध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून जिल्हाधिकारी, अमरावती यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र. (५) येथील शासन निर्णयान्वये अचलपूर, **अमरावती** या ठिकाणी उपजिल्हा रूग्णालय बांधकामाकरीता वितरित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रू.४७३.८३७/- लाख तसेच राज्य हिश्श्यातील रू.१२६.३६ /- लाख असा एकुण रू.६००.१९७/- लाख ( केंद्र + राज्य ) इतका निधी जिल्हाधिकारी, अमरावती यांना खालील तक्त्यातील स्तभं क्र. (९) व (१०) प्रमाणे मंजूर करून PFMS प्रणालीव्दारे वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**आचलपूर, जि-अमरावती** **(रु. लाखात)**

| प्रकल्पाचे नाव | युनिटची संख्या | प्रती युनिट खर्च | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण | चलनाने शासनखाती जमा करण्यात आलेला हिस्सा | | वितरीत करावयाचा हिस्सा | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| अचलपूर जि.अमरावती येथे २०० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय बांधकाम. | ०१ | ६३१७.८९ | ३७९०.७ | २५१७.२ | ६३१७.८९ | ४७३.८३७ | १२६.३६ | ४७३.८३७ | १२६.३६ |
| **एकूण** | **०१** | **६३१७.८९** | **३७९०.७** | **२५१७.२** | **६३१७.८९** | **४७३.८३७** | **१२६.३६** | **४७३.८३७** | **१२६.३६** |

२. केंद्र व राज्य शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) व्दारे निधी वितरीत करण्यास सुरूवात करण्यात आली आहे. त्यानुषंगाने

- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनकरीता Single Nodal Agency म्हणून अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात आली आहे.
- तसेच सदर योजनेचे SNA खाते स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. सदर योजना PFMS प्रणालीवर Map करण्यात आली आहे.

३. सन २०२२-२३ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील प्रकल्प राबविण्यासाठी केंद्र शासनाकडून विविध कामांना वितरीत केलेला व त्यासमरूप वितरीत करावयाचा राज्य हिश्श्यातील निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आलेल्या SNA खाते क्र.40533345678 व IFSC CODE - SBIN0061524 खात्यावर जमा करण्यात आला आहे.

४. जमा करण्यात आलेल्या योजनेच्या SNA खात्यामधून उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र. (९) व (१०) प्रमाणे मंजूर करण्यात आलेला केंद्र व राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्यातील **रू.**६००.१९७/-लाख इतका निधी PFMS प्रणालीव्दारे अचलपूर, जि.अमरावती येथे उपजिल्हा रूग्णालय बांधकामाकरीता जिल्हाधिकारी, अमरावती यांना वितरीत करण्यात येत आहे. याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. जिल्हाधिकारी, अमरावती यांनी PFMS प्रणालीव्दारेच सदर रक्कम विकासकामांच्या अंमलबजावणीशी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

५. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीकरिता संबंधित अमंलबजावणी यंत्रणेने आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करून घ्यावी. शासन निकषानुसार तसेच विकासकामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मंजुरीनुसार निविदा प्रक्रिया करावी. सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मंजुरी तसेच प्रत्यक्ष निधी प्राप्त झाल्याशिवाय कामास सुरूवात करू नये. विकासकामांशी संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून निर्गमित करण्यात येणाऱ्या तांत्रिक मंजुरीच्या / कामाच्या आदेशानुसार, विकासकामांची अमंलबजावणी विहीत कालावधीत पूर्ण करण्याबाबत जिल्हाधिकारी, अमरावती यांनी दक्षता घ्यावी.

६. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता जिल्हाधिकारी, अमरावती यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, अमरावती यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

७. अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत विकासकामांच्या बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR), अद्ययावत छायाचित्रांसह जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत विकासकामांच्या बांधकामाची माहिती वेळोवेळी Upload करावी.

८. जिल्हाधिकारी, अमरावती यांनी मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीसाठी दुसऱ्या टप्प्यातील निधीची मागणी करताना पहिल्या टप्प्यात प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे (UC) तसेच त्रैमासिक अहवाल (QPR), अद्ययावत छायाचित्रांसह प्रस्तावासोबत शासनास सादर करावी. तसेच निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, अमरावती यांची राहील.

१०. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२२४१२४८३५६९१४ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba77108c21a289d50d4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47644BA707F1CC419E5362269A74B7B1EC6AB4F745648DEF2597546D88711BB4, cn=SARANGKUMAR VASANTRAO PATIL
Date: 2023.02.24 12:54:38 +05'30'

**( सारंगकुमार पाटील )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आरोग्य अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,राआसो,मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन).
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, अमरावती विभाग.
७. विभागीय आयुक्त, अमरावती.
८. जिल्हाधिकारी, अमरावती.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,अमरावती.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
१२. अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी,मुंबई.
१३. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रूग्णालय, अमरावती.
१४. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४/ व्यय -४),मंत्रालय, मुंबई.
१५. नियोजन विभाग (कार्या.१४७५).
१६. निवड नस्ती, का.७..